नैसर्गिक आपत्तीमुळे बाधीत शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) योजनेसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्र.संकिर्ण०३२४/प्र.क्र.३०/२-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ३० मार्च २०२४

**संदर्भ** :- १) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र.क्र.११ /२-स, दि २३.०८.२०१९.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. कृकमा ०८१९/प्र.क्र.११ /२-स, दि २७.०८.२०१९.
३) वित्त विभाग, परीपत्रक क्र. पूरक-२०२३/प्र.क्र.९४ /अर्थ-३,दि. १९.१२.२०२३.
४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. पूरक १९२३/प्र.क्र.१०२ /१७-स. दि.२८.१२.२०२३
५) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था यांचे पत्र क्र.कृषीपत-०२/जुलै व ऑगस्ट, २०१९ अतिवृष्टी/ निधी मागणी/२०२४/७९१. दि.१४.०३.२०२४.
६) वित्त विभागाचे परीपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३.दि. ०५.०२.२०२४

**प्रस्तावना -:**

राज्यात जुलै, २०१९ ते ऑगस्ट, २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या जिल्हयातील बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्याच्या योजनेअंतर्गत रु. ५२,५६२.०० लाख इतकी रक्कम वितरीत करण्यात आली आहे. तसेच सदर योजनेसाठी सन २०२३-२४ साठी सन २०२३ च्या हिवाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीद्वारे रु. ३७९.९९ लाख इतका निधी मंजूर करण्यात आला असुन त्यानुसार सदर योजनेच्या अनुषंगाने सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांनी संदर्भ क्र.५ च्या पत्रान्वये हिवाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीद्वारे मंजुर निधीपैकी उर्वरीत निधी रु. ११४.०० लाख वितरीत करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार सदर योजनेंतर्गत निधी वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

सदर योजनेसाठी सन २०२३-२४ साठी सन २०२३ च्या हिवाळी अधिवेशनातील पुरवणी मागणीद्वारे मंजूर झालेल्या रु. ३७९.९९ लाख इतक्या निधीपैकी रु. ११४.०० लाख (रु. एकशे चौदा लाख फक्त) एवढा निधी राज्यात जुलै, २०१९ ते ऑगस्ट, २०१९ या कालावधीमध्ये अतिवृष्टीमुळे उद्भवलेल्या पूर परिस्थितीत बाधित झालेल्या जिल्हयातील बाधित शेतकऱ्यांचे पीक कर्ज माफ करण्यासाठी सहाय्य (राज्यस्तर)(कार्यक्रम), (२४२५ ०१३३) ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाअंतर्गत वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर तरतूद खर्च करण्यासाठी (V०००४) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अधिनस्त सहायक निबंधक (अंदाज व नियोजन), सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. तसेच लेखाधिकारी, अधिन सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे. सदर निधी आहरण करुन वेळेत खर्च होईल याची सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दक्षता घ्यावी. तसेच या बाबतचा अहवाल व खर्चाची माहिती वेळोवेळी शासनास सादर करावी.

**३.** सदर खर्च मागणी क्रमांक व्ही-०२, २४३५-इतर कृषीविषयक कार्यक्रम, ६०-इतर,(००) (१०१) शेतकऱ्यांसाठी कर्जमाफी योजना (००) (०२) नैसर्गिक आपत्तीमुळे बाधित शेतकऱ्यांना कर्जमाफी (राज्यस्तर) (२४३५०१३३), ३३ अर्थसहाय्य या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या तरतूदीमधून करण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय नियोजन विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २०५/का.१४३१, दिनांक १९.०३.२०२४ अन्वये व वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्रमांक २९४/२०२४/व्यय-२, दिनांक २६.०३.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३३०१९०५०८२८०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SANTOSH ARUN PATIL

Digitally signed by SANTOSH ARUN PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=ca78467bcc4594e1e11741a7962a7a83feafb176442575037160fc343c4ae5ab,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E52439642AB57C332B2A3E3E46F0D907BA6167409EF6D52C943BF775ECF042FD, cn=SANTOSH ARUN PATIL
Date: 2024.03.30 19:14:53 +05'30'

**( संतोष पाटील )**
**अपर निबंधक तथा सहसचिव,**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखाकार (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-२, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, पुणे.
५) निवासी व लेखापरिक्षा अधिकारी, पुणे.
६) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).
७) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
८) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था (सर्व).
९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-१३/ व्यय-२), / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) अवर सचिव (कार्यासन १७-स), सहकार, पणन वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (कार्यासन २-स).